# ग्रंथालयात सिंह



# ग्रंथालयात सिंह



एके दिवशी ग्रंथालयात एक सिंह आला. तो दाराजवळचा पुस्तकं देण्याघेण्याचा कक्ष ओलांडून सरळ आत गेला, पुस्तकांच्या कपाटांपाशी.



तेथील एक कर्मचारी श्रीयुत मॅकबी प्रमुख ग्रंथपालांच्या कार्यालयात पळत गेले.

“मेरीवेदर बाई!” ते धापा टाकत बोलू लागले.

“पळापळ करू नका,” मेरीवेदर बाई त्यांच्याकडे न बघताच म्हणाल्या.

“अहो, पण एक सिंह आलाय ग्रंथालयात!” श्रीयुत मॅकबी म्हणाले.

“त्याने ग्रंथालयाचा नियम वगैरे मोडलाय का?” मेरीवेदर बाईंनी विचारलं. नियमांबाबत त्या फार कठोर होत्या.

“नाही,” श्रीयुत मॅकबी विचार करत उत्तरले, “तसं काही झालं नाही.”

“मग राहू दे त्याला,” मेरीवेदर बाई म्हणाल्या.

सिंह ग्रंथालयात चौफेर भटकू लागला. तो पुस्तकांच्या नावांची कार्ड हुंगू लागला.



नव्या पुस्तकांच्या ढिगाऱ्यावर तो आपलं डोकं घासू लागला.



मग तो गोष्टीच्या पुस्तकांच्या कक्षात जाऊन झोपी गेला.



काय करावं, कुणाला काही सुचेना?
ग्रंथालयात सिंहाने कसं वागावं, याबाबत काही नियमसुद्धा नव्हते.

लवकरच मुलांची गोष्ट ऐकण्याची वेळ झाली.
या वेळातसुद्धा सिंहाने काय करावं, याचे नियम नव्हते.
गोष्ट सांगणारी बाई थोडी घाबरली, हे खरं.
पण तिने स्पष्ट आवाजात आपल्या पहिल्या गोष्टीचं शीर्षक वाचलं.
सिंहाने वर मान करून पाहिलं. बाई गोष्ट वाचत राहिल्या.



सिंह पुढची गोष्ट ऐकण्यासाठीही थांबला. मग आणखी एक गोष्ट त्याने ऐकली. त्याला आणखी एक गोष्ट ऐकायची होती. पण तोवर मुलांची घरी जाण्याची वेळ झाली.

“गोष्ट ऐकण्याची वेळ संपली,” एक छोटी मुलगी सिंहाला म्हणाली, “आता जाण्याची वेळ झालीय.”
सिंहाने मुलांकडे पाहिलं. मग त्याने गोष्ट सांगणाऱ्या बाईकडे पाहिलं. त्याने मिटलेल्या पुस्तकांकडे पाहिलं.
मग मोठ्याने गर्जना केली.




मेरीवेदर बाई आपल्या कार्यालयातून बाहेर आल्या.
“कोण एवढा गोंगाट करतंय?” त्यांनी रागाने विचारलं.
“सिंह गर्जना करतोय,” श्रीयुत मॅकबी म्हणाले.
मेरीवेदर बाईंनी सिंहाला फटकारलं, “तुला शांत बसता येत नसेल तर बाहेर जा.” त्या कठोरपणे पुन्हा म्हणाल्या, “हा ग्रंथालयाचा नियम आहे.”
सिंह गर्जना करत राहिला. तो उदास वाटत होता.
छोट्या मुलीने मेरीवेदर बाईंना विचारलं, “तो शांत बसणार असेल तर उद्या पुन्हा गोष्ट ऐकायला त्याला येऊ द्याल?”
सिंहाने गर्जना थांबवल्या. तो मेरीवेदर बाईंकडे पाहू लागला.
मेरीवेदर बाईंनी वळून सिंहाकडे पाहिलं. मग त्या म्हणाल्या, “का नाही! तो शांत बसून गोष्ट ऐकणार असेल तर नक्कीच उद्या पुन्हा येऊ शकतो.”
“हुर्रे!" मुलांनी आनंदाने गलका केला.



पुढल्या दिवशी सिंह पुन्हा आला.
“तू खूप लवकर आलास. गोष्ट ऐकायची वेळ तीन वाजता आहे,” मेरीवेदर बाई म्हणाल्या.
पण सिंह तिथून हलला नाही.



“ठीकाय,” मेरीवेदर बाई म्हणाल्या, “फावल्या वेळात तू आम्हाला काही मदत करू शकतोस.”
गोष्ट ऐकायची वेळ होईपर्यंत त्यांनी सिंहाकडून विश्वकोशांवरची धूळ साफ करून घेतली.



पुढल्या दिवशी सिंह पुन्हा लवकर आला. मेरीवेदर बाई पुस्तकं परत न केलेल्या लोकांना नोटीसा पाठवत होत्या. त्यांनी सिंहाकडून नोटीसाच्या लिफाफ्यांना चाटून चिकटवण्याचं काम करून घेतलं.





लवकरच सिंह कुणाला न विचारताच ग्रंथालयातील कामे करू लागला. तो विश्वकोशांवरची धूळ झटकू लागला. लिफाफे चाटून चिकटवू लागला. उंच कपाटांवर पुस्तकं ठेवण्यासाठी लहान मुलांना पाठीवर बसवू लागला.

कामे झाल्यावर एका कोपऱ्यात बसून गोष्ट ऐकण्याच्या वेळेची वाट बघू लागला.



सुरुवातीला ग्रंथालयातील लोक सिंहाला घाबरत असत. पण लवकरच त्यांना त्याची सवय झाली. खरंतर, सिंह ग्रंथालयासाठी खूप उपयुक्त ठरला. त्याची मोठी पाऊले ग्रंथालयाच्या जमिनीवर काही आवाज करत नसत. गोष्ट ऐकण्याच्या वेळेस मुलं सिंहाच्या अंगाला टेकून बसत. सिंहाने नंतर कधी ग्रंथालयात गर्जनाही केली नाही.

“किती मदत करतो हा सिंह!” लोक म्हणू लागले. ते त्याच्या मऊशार आयाळीला हाताने गोंजारू लागले, “हा नसता तर आमची कामं कशी झाली असती!”

हे ऐकून श्रीयुत मॅकबी यांच्या कपाळावर आठ्या पडल्या. सिंह येण्याच्या अगोदरही ग्रंथालयाचं काम व्यवस्थितच सुरू होतं. त्यासाठी सिंहाची कधी गरज पडली नव्हती. सिंह ग्रंथालयाचे नियम समजू शकणार नाही, त्याची जागा या ग्रंथालयात नाही असं मॅकबींना वाटत असे.



एक दिवस सिंह साऱ्या विश्वकोशांवरची धूळ झाडून, सगळ्या लिफाफ्यांना चाटून आणि बच्चेकंपनीला मदत करून लवकर मोकळा झाला. गोष्ट ऐकायला अद्याप बराच वेळ होता. मग तो मेरीवेदर बाईंच्या कार्यालयात आणखी काम विचारण्यासाठी गेला.

“हॅलो, सिंह महाशय!” मेरीवेदर बाई उद्गारल्या.

“माझ्याकडे तुझ्यासाठी आणखी एक काम आहे. पण आधी मी या शेल्फवरची काही पुस्तकं खाली काढते.”

मेरीवेदर बाई स्टुलावर चढल्या. पण त्यांचा हात वरच्या शेल्फपर्यंत पोहोचत नव्हता.

मेरीवेदर बाई आपल्या पायांच्या बोटांवर उभ्या राहिल्या. त्यांनी आपल्या हातांची बोटं पसरली. “थांब जरा, झालंच माझं,” त्या म्हणाल्या.

मेरीवेदर बाई आणखी थोड्या उंचावल्या आणि त्याचवेळी तोल जाऊन स्टुलावरून खाली पडल्या. .

“आई गं!" मेरीवेदर बाई विव्हळल्या. त्या उठू शकत नव्हत्या.

“मॅकबीजी! मॅकबीजी!“ त्या हाका मारू लागल्या.

श्रीयुत मॅकबी पुस्तकांची देव-घेव करण्याच्या कक्षात होते. त्यांना मेरीवेदर बाईंचा आवाज ऐकू आला नाही.

“सिंह महाशय,” मेरीवेदर बाई म्हणाल्या, “कृपा करून श्रीयुत मॅकबींना बोलावून आण.”

मग सिंह पळत गेला.



“पळू नकोस,” मेरीवेदर बाई त्याच्यावर किंचाळल्या.

सिंहाने आपले मोठमोठे पंजे श्रीयुत मॅकबींच्या टेबलवर ठेवले आणि तो त्यांच्याकडे बघू लागला.

“इथे थांबू नकोस,” श्रीयुत मॅकबी त्याच्यावर खेकसले, “मी खूप कामात आहे.”

सिंह केविलवाणा झाला. त्याने आपल्या नाकाने मेरीवेदर बाईंच्या कार्यालयाकडे इशारा केला.

श्रीयुत मॅकबींनी त्याच्याकडे दुर्लक्ष केलं.

शेवटी, सिंहाने त्यांचं लक्ष वेधून घेण्यासाठी त्याला जे शक्य होतं तेच केलं. त्याने श्रीयुत मॅकबींच्या नजरेला नजर भिडवली आणि आपला जबडा शक्य तितका उघडून मोठ्याने गर्जना केली.






श्रीयुत मॅकबींच्या हृदयाची धडधड वाढली.
“शांतता राख,” ते सिंहाला म्हणाले. “तू ग्रंथालयाचा नियम मोडतोयस”.
मग श्रीयुत मॅकबी जवळजवळ धावतच मेरीवेदर बाईंच्या कार्यालयाकडे जाऊ लागले.
सिंह त्यांच्या मागोमाग गेला नाही. त्याने नियम मोडला होता. त्याचे परिणाम त्याला माहित होते. मान खाली घालून तो दरवाजाकडे चालू लागला. श्रीयुत मॅकबींनी त्याच्याकडे लक्ष दिलं नाही.
“मेरीवेदर बाई!” ते हाका मारत जाऊ लागले, “मेरीवेदर बाई, बघा सिंहाने ग्रंथालयाचा नियम मोडला.”

ते धुसफुसतच मेरीवेदर बाईंच्या कार्यालयात घुसले.



पण त्या आपल्या खुर्चीवर नव्हत्या.
“मेरीवेदर बाई!“ त्यांनी हाक मारली.
“कधी कधी,” मेरीवेदर बाई जमिनीवर पडलेल्या अवस्थेच म्हणाल्या, “ग्रंथायलाचा नियम मोडण्यामागे योग्य कारणे असतात. कृपा करून, लवकरात लवकर एक डॉक्टर बोलवा. मला वाटतं, माझ्या मनगटाचं हाड मोडलंय.”
श्रीयुत मॅकबी डॉक्टरांना बोलावण्यासाठी पळाले.
“पळू नका,” मेरीवेदर बाई त्यांच्यावर ओरडल्या.



पुढल्या दिवशी ग्रंथालयाचे व्यवहार बऱ्यापैकी सुरळीत झाले.

मेरीवेदर बाईंच्या डाव्या हाताला मलमपट्टी केली होती. डॉक्टरांनी त्यांना फार श्रम न करण्याची सूचना केली.

“मला माझ्या कामात सिंहाची मदत घेता येईल,” मेरीवेदर बाईंच्या मनात आलं. पण त्या दिवशी सकाळी सिंह ग्रंथालयात आलाच नाही.

तीन वाजता मेरीवेदर बाई गोष्ट ऐकायच्या खोलीत गेली. गोष्ट सांगणाऱ्या बाईने मुलांना गोष्ट सांगायला सुरुवात केली. पण तिथे सिंह नव्हता.





ग्रंथालयात मुलं आपल्या पुस्तकांतून आणि कॉम्प्युटरच्या स्क्रीनवरून वारंवार वर बघत होती. त्यांची नजर त्यांच्या लाडक्या सिंहाचा चेहरा पाहाण्यासाठी आतुर झाली होती. पण सिंह त्या दिवशी आलाच नाही.

सिंह दुसऱ्या दिवशीही आला नाही. आणि त्या नंतरच्या दिवशीसुद्धा नाही.

एके सायंकाळी घरी जाताना श्रीयुत मॅकबी मेरीवेदर बाईंच्या कार्यालयात डोकावले. “जाण्याआधी मी तुम्हाला काही मदत करू शकतो का?” त्यांनी मेरीवेदर बाईंना विचारलं. “नको, धन्यवाद!” मेरीवेदर बाई उत्तरल्या. त्या खिडकीबाहेर पाहात होत्या. त्या खूप शांत आणि हळू आवाजात बोलत होत्या.



श्रीयुत मॅकबी निराश झाले. मेरीवेदर बाईंसाठी काहीतरी करायला हवं, असं त्यांना वाटू लागलं.

श्रीयुत मॅकबी ग्रंथालयातून निघाले. पण ते घरी गेले नाहीत.



ते आजुबाजूच्या परिसरात काही शोधत फिरू लागले. उभ्या असलेल्या मोटरगाड्यांच्या खाली, झाडाझुडपांमध्ये त्यांनी शोध घेतला.



परसदारी, कचऱ्याच्या पेट्यांमध्ये, झाडांवरच्या घरांमध्ये त्यांनी धांडोळा घेतला.



अखेरीस ते ग्रंथालयात परतले.
सिंह बाहेर बसला होता. तो दरवाजाच्या काचेतून आत बघत होता.
“हॅलो, सिंह महाशय,” श्रीयुत मॅकबी म्हणाले.
सिंहाने त्यांच्याकडे वळून पाहिलं नाही.
“ग्रंथालयाने एक नवा नियम बनवला आहे. तुला जाणून घ्यायला आवडेल असं मला वाटतं,” श्रीयुत मॅकबी सांगू लागले, “यापुढे संकटात असलेल्या कुणाला वाचवण्यासाठी ग्रंथालयात गर्जना केली तर त्याला परवानगी असेल.”
सिंहाने आपले कान हलवले. मग तो पाठीमागे वळला.
परंतु तेवढ्यात श्रीयुत मॅकबी तिथून निघून गेले.

पुढल्या दिवशी श्रीयुत मॅकबी मेरीवेदर बाईंच्या कार्यालयात गेले.
“काय झालं मॅकबीजी?”मेरीवेदर बाईंनी आपल्या नव्या शांत, उदास स्वरात विचारलं.
“तुम्हाला हे माहित असावं असं मला वाटतं,” श्रीयुत मॅकबी सांगू लागले, “ग्रंथालयात एक सिंह आलाय.”
हे ऐकताच मेरीवेदर बाईंनी आपल्या खुर्चीतून उडी मारली आणि त्या ग्रंथालयाकडे पळू लागल्या.
श्रीयुत मॅकबींच्या चेहऱ्यावर स्मित पसरलं.
“पळू नका,” ते मेरीवेदर बाईंवर खोटंखोटं ओरडले.
मेरीवेदर बाईंनी त्यांचं ऐकलं नाही.

कधीकधी योग्य कारणासाठी नियम मोडले, तर ते माफ असतं. अगदी ग्रंथायलातसुद्धा!

समाप्त

